**कोराडी औष्णिक विद्युत प्रकल्प संच क्र.६ च्या सुधारीकरणास व आधुनिकीकरणासाठी महानिर्मिती कंपनी मर्यादित यांना प्राप्त झालेल्या अनुदानाच्या रकमेच्या समायोजना बाबत वित्तीय वर्ष २०१६-१७**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. निधीवि-२०१६/प्र.क्र.४४(८ )/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक - ३१ मार्च, २०१७

<u>संदर्भ</u> - १. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१६/.क्र.८९/अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६; दि. २३ ऑगस्ट, २०१६ ; दि. ४ जानेवारी, २०१७ व दि.०८ फेब्रुवारी २०१७.
२. महानिर्मिती कंपनीचे पत्र क्र. MD/MSPGCL/GOM/No.०२४०८, दि. ८ मार्च, २०१७
३. शासन निर्णय क्र. समायोजन-२०१६/प्र.क्र.९९(२)/ऊर्जा-३, दि. ३१मार्च, २०१७
४. शासन निर्णय क्र. समायोजन-२०१६/प्र.क्र.९९(२) (अ)/ऊर्जा-३, दि. ३१ मार्च, २०१७

**<u>प्रस्तावना :-</u>**

कोराडी औष्णिक विद्युत प्रकल्प संच क्र.६ सुधारीकरण व आधुनिकीकरण प्रकल्प जागतिक बँकेच्या सहकार्याने उभारण्यात येत आहे. सदर प्रकल्पासाठी सन २०१६-१७ या वर्षाकरिता अनुदान म्हणून रु.४९.२६ कोटी इतकी तरतूद करण्यात आलेली आहे.

जागतिक बँकेकडून सन २०१६-१७ मध्ये अनुदान स्वरुपात रु. २५,२७,१८,०००/- इतकी रक्कम मंजूर करण्यात आली असून त्यापैकी उपरोक्त संदर्भ क्र. ३ व ४ अन्वये रु.१५,१७,७१,६१५/- इतकी रक्कम समायोजनाद्वारे यापूर्वी वितरीत केली आहे. महानिर्मिती कंपनीस रु.८,४०,०८,०१६/- इतकी रक्कम थेट प्राप्त झालेली आहे व रु.१,६९,३८,३६९/- राज्य शासनाच्या खात्यात जमा झालेली आहे. महानिर्मिती कंपनीस थेट प्राप्त झालेली रक्कम रु.८,४०,०८,०१६/- समायोजनाद्वारे वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महानिर्मिती कंपनीच्या कोराडी युनिट क्र.६ (आधुनिकीकरण व नूतनीकरण) प्रकल्पास केंद्र शासनाच्या पुढाकाराने जागतिक बँकेकडून मंजूर झालेलया अनुदानापैकी सन २०१६-१७ मध्ये महानिर्मिती कंपनीला थेट प्राप्त झालेली रक्कम रु.८,४०,०८,०१६/- /- (रुपये आठ कोटी चाळीस लाख आठ हजार सोळा फक्त) चे पुस्तकी समायोजन करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे,त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३. वरील बाबींचा खर्च "मागणी क्रमांक के-०६, २८०१ वीज,०५,पारेषण व वितरण, १९९ अशासकीय संस्थाना सहाय्य, (००), (००)(०१) एमएसपीजीसीएल ला कोराडी औष्णिक विद्युत प्रकल्प संच क्रमांक ६ च्या नुतनीकरणासाठी व आधुनिकीकरणासाठी सहाय्य (२८०१२८७६) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)” या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकावा व तो सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधुन समायोजित करण्यात यावा.

४. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन, महालेखापाल मुंबई यांचे अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने या रकमेचे देयक तयार करण्यात येऊ नये. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ यांनी त्यांच्या अखत्यारीत व अधिकारात रु.८,४०,०८,०१६/- /- (रुपये आठ कोटी चाळीस लाख आठ हजार सोळा फक्त) चे पुस्तकी समायोजन करुन शासनास तसे कळवावे.

५. दि.२० एप्रिल २०१६ च्या परिपत्रकान्वये, अर्थसंकल्प अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी या परिपत्रका सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या बाबींसाठी तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची तसेच परिच्छेद क्र. ७ ते १८ मधील प्रत्येक अटीची व परिशिष्टातील अनु.क्र. ३ व ९ मधील अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणाणित करण्यात येत आहे.

६. वित्त विभागाच्या दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकान्वये मासिक विवरण पत्रानुसारचा निधी जून ते डिसेंबर या कालावधीमध्ये पुढे / मागे ओढून घेण्याची सुविधा दिलेली आहे. तसेच वित्त विभागाच्या दिनांक ०८/०२/२०१७ च्या परिपत्रकात नमूद केलेल्या परिच्छेद क्र. २ ते ६ मधील प्रत्येक अटीची पूर्तता झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.व सदर परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार प्रशासकीय विभागास देण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन सदर निधी वितरीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१७०३३१२११२५११०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Mahadeorao Rajurkar

Digitally signed by Vilas Mahadeorao Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry, Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=83469494bac86099a320f3e14bf8421ee9d2b48e344470b76ea2595df04951b4, serialNumber=02c5c00269dd48836be0d9939bdff848a9ff1f1a9fd195baf3a104d09b0817d9, cn=Vilas Mahadeorao Rajurkar
Date: 2017.04.01 01:41:39 +05'30'

**(वि.म.राजुरकर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत:-**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१

२) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.

३) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१), मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
७) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
८) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
९) विशेष कार्य अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१०) क.अ.अधिकारी (प्रशा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
११) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
१२) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग,ऊर्जावकामगारविभाग,सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, कर मार्ग रामकृष्ण चेंबूर, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.
१३) मुख्य अभियंता (विद्युत) जल विद्युत प्रकल्प, मुंबई ४००००१
१४) कक्ष अधिकारी(ज.वि) जल संपदा विभाग,मंत्रालय मुंबई.
१५) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२